**अधीक्षक अभियंता, अमरावती पाटबंधारे प्रकल्प मंडळ, अमरावती अधिनस्त कार्यकारी अभियंता, अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग क्र. १, अमरावती अंतर्गत तीन उपविभागीय कार्यालयातील नियत अस्थायी व रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दिनांक ०१/०३/२०२३ ते दिनांक ३१/०८/२०२३ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुवाढ-२०२३/(१९२/२०२३)/लपा**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २५.०४.२०२३

**पहावे :-** १) शासन निर्णय क्रमांक मुवाढ-२०२२/(३२२/२०२२)/लपा, दिनांक : २९/०९/२०२२.
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि. ०८.०२.२०२३
३) अधीक्षक अभियंता, अमरावती पाटबंधारे प्रकल्प मंडळ, अमरावती यांचे पत्र क्र.७८२/आस्था-३/ मुदतवाढ/२०२३, दि.१५.०३.२०२३

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन क्र.१ चे शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता, अमरावती पाटबंधारे प्रकल्प मंडळ, अमरावती अधिनस्त कार्यकारी अभियंता, अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग क्र. १, अमरावती अंतर्गत तीन उपविभागीय कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ४९ पदांना व रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील ०१ पदास दि. २८/०२/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. संदर्भ क्र.२ चे वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि. ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय:-**

संदर्भ क्रमांक ३ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या परिशिष्ट “अ”, आणि “ब” मध्ये दर्शविल्याप्रमाणे अधीक्षक अभियंता, अमरावती पाटबंधारे प्रकल्प मंडळ, अमरावती अधिनस्त कार्यकारी अभियंता, अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग क्र. १, अमरावती अंतर्गत तीन उपविभागीय कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ४९ पदांना व रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील ०१ पदास दि. ०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे, सदर कर्मचारी कार्यरत असेपर्यंत चालु राहतील.
२) उपरोक्त पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
३) मुदतवाढ मंजुरी द्यावयाची नियत अस्थायी पदे विहित आकृतीबंधातील असावीत व ही पदे सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त/व्यपगत झालेली नसतील.
४) अधीक्षक अभियंता, अमरावती पाटबंधारे प्रकल्प मंडळ, अमरावती यांच्या कार्यालयाने उपलब्ध करुन दिलेल्या प्रस्तावामधील पदांची संख्या/पदांमधील घट/पदांमधील वाढ/सेवानिवृत्ती इ. माहिती अंतिम/अचूक आहे असे गृहित धरुन त्यांचे मागणीनुसार पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.
५) या सर्व पदांचा पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विहित प्रपत्रात प्रमाणपत्रासह विनाविलंब सादर करण्यात यावा.

या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आलेल्या पदांपैकी नियत अस्थायी आस्थापनेच्या पदांचा वेतनाचा खर्च "मागणी क्र.आय-५,मुख्य लेखाशीर्ष ४७०२ लहान पाटबंधारे यावरील भागभांडवली खर्च(८०) सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (००), (००) (०५), विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ५१०१)"(लहान पाटबंधारे)(कार्यक्रम) या लेखाशीर्षाखाली तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेच्या पदांचा वेतनाचा खर्च ""मागणी क्र.आय-५,मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च(८०)सर्वसाधारण,१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भागभांडवली अंशदान (०४) (०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (अनिवार्य) (४७०१ आय १७१)"या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्या खालील मंजूर अनुदानातुन भागवावा.

हा निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०८.०२.२०२३ अन्वये प्रशासनिक विभागाला प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२५१८३४२९१७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

REKHA AJIT BHAWAR

Digitally signed by REKHA AJIT BHAWAR
DN: CN = REKHA AJIT BHAWAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.04.25 18:40:06 +05'30'

**( रेखा भवार )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**सहपत्र :- परिशिष्ट अ, ब**

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य - २, नागपूर.
२. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प,जलसंपदा विभाग, अमरावती
३. अधीक्षक अभियंता, अमरावती पाटबंधारे प्रकल्प मंडळ, अमरावती
४. कार्यकारी अभियंता, अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग, अमरावती.
५. कक्ष अधिकारी , आ(प्रशि) कार्यासन, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती/मुदतवाढ, लपा संग्रहार्थ.

**परिशिष्ट - अ**

**शासन निर्णय क्र.मुवाढ २०२३/(१९२/२०२३)/लपा , दि. २५/०४/२०२३ चे सहपत्र**

**नियत अस्थायी पदांचा तपशिल**

**सेवा सातत्य कालावधी दि.०१/०३/२०२३ ते दि. ३१/०८/२०२३**

**विभागाचे नाव:- कार्यकारी अभियंता, अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग क्र. १, अमरावती**

| अ.क्र | कार्यालयाचे नांव | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | घुंगशी प्रकल्प उप विभाग क्र. २, अमरावती (बांध) | १. उप विभागीय अभियंता/ अधिकारी | १ |
| | | २.कनिष्ठ अभियंता/शा.अ./स.अ. -२ | ६ |
| | | ३.वरिष्ठ लिपिक | १ |
| | | ४. कनिष्ठ लिपिक | २ |
| | | ५.शिपाई | ३ |
| | | ६.चौकीदार | १ |
| | | **एकुण पदे** | **१४** |
| २ | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग मुर्तिजापूर | १) उपविभागीय अभियंता/ अधिकारी | १ |
| | | २) क.अ./स.अ.श्रेणी-२/शाखा अभियंता | ५ |
| | | ३) वरिष्ठ लिपीक | १ |
| | | ४) कनिष्ठ लिपीक | १ |
| | | ५) टंकलेखक | १ |
| | | ६) अनुरेखक | १ |
| | | ७) स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक | ३ |
| | | ८) वाहन चालक | १ |
| | | ९) शिपाई | ३ |
| | | १०) चौकीदार | १ |
| | | **एकुण पदे** | **१८** |
| ३ | निम्न पेढी कालवे उपविभाग क्र. २, अमरावती (बांध) | १) उपविभागीय अभियंता/अधिकारी | १ |
| | | २) क.अ./स.अ.श्रेणी-२/शाखा अभियंता | ४ |
| | | ३) स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक | ४ |
| | | ४) वरिष्ठ लिपीक | १ |
| | | ५) कनिष्ठ लिपीक | २ |
| | | ६) अनुरेखक | १ |
| | | ७) वाहन चालक | १ |
| | | ८) शिपाई | २ |
| | | ९) चौकीदार | १ |
| | | **एकुण पदे** | **१७** |
| **नियत अस्थायी एकूण पदे ४९** | | | |

परिशिष्ट - ब

शासन निर्णय क्र.मुवाढ - २०२३/(१९२/२३)/लपा , दि.  २५/०४/२०२३ चे सहपत्र

रुपांतरीत अस्थायी पदांचा तपशिल

सेवा सातत्य कालावधी दि. ०१/०३/२०२३ ते दि. ३१/०८/२०२३

| अ.क्र | पदनाम | संख्या | पदधारकाचे नांव | सेवानिवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| कार्यकारी अभियंता, अमरावती प्रकल्प बांधकाम विभाग, अमरावती | | | | |
| १ | स्वच्छक | १ | अशोक वि. ढोले | ३०/०६/२०२७ |
| रुपांतरीत अस्थायी पद एकूण ०१ | | | | |

REKHA AJIT BHAWAR

Digitally signed by REKHA AJIT BHAWAR
DN: CN = REKHA AJIT BHAWAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.04.25 18:40:22 +05'30'

( रेखा भवार )

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन